**गडचिरोली जिल्हा कारागृह येथे अतिरिक्त बाह्य परिसर प्रकाश योजना करणे या कामाचे येणाऱ्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१३१५/प्र.क्र.१९३/तुरुंग-२**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १४ सप्टेंबर, २०१५

**वाचा**

१) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अ.शा.पत्र क्र.बीएलडी/गडजिका/बाह्यप्र.योजना/६७६८/कक्ष-६(३), दि.०४.०७.२०१५.

**प्रस्तावना**

गडचिरोली जिल्हा कारागृह तातडीने कार्यान्वित करणेबाबतची दखल मा.मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे दाखल जनहित याचिका क्र. २१/२०१३ मध्ये घेण्यात आली असून, गडचिरोली जिल्हा कारागृह तातडीने कार्यान्वित करण्याकरिता गडचिरोली जिल्हा कारागृह येथे अतिरिक्त बाह्य परिसर प्रकाश योजना करणे अत्यंत आवश्यक असल्याचे वरील वाचा येथील पत्रात नमूद केले आहे. गडचिरोली जिल्हा कारागृह येथे अतिरिक्त बाह्य परिसर प्रकाश योजना करणे या कामाचे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर यांनी रुपये २७,०४,१०६/- इतक्या खर्चाचे तपासून व साक्षांकित केलेली अंदाजपत्रके अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनाच्या प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केली आहेत. त्यास अनुसरुन याद्वारे शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय**

गडचिरोली जिल्हा कारागृह येथे अतिरिक्त बाह्य परिसर प्रकाश योजना करणे या कामाचे छाननीअंती एकूण रुपये २७,४१,०००/- (रुपये सत्तावीस लक्ष एकेचाळीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून शासन प्रशासकीय मान्यता देत आहे:-

१) सदर कामाचा खर्च कारागृह विभागाच्या उपलब्ध असलेल्या नियतव्ययामध्ये समाविष्ट करता येणे शक्य आहे याची खातरजमा करण्यात यावी.

२) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही २०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

२. सदरचे अंदाजपत्रक सन २०१४-१५ च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर अंदाजपत्रकात आकस्मिक खर्चासाठी ४ टक्के, संगणकीकरणासाठी २ टक्के इ. आवश्यक रकमांची ठोक तरतूद समाविष्ट करण्यात आल्या आहेत.

३. यासाठी होणारा खर्च हा मागणी क्र.एच-८, ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, १०१, बांधकाम, (००)(०) तुरुंग, पंचवार्षिक योजना या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक-३, नियम १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०९०५१२२०२७९६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jaysing L Pawara

Digitally signed by Jaysing L Pawara
DN: CN = Jaysing L Pawara, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.09.30 15:21:00 +05'30'

(ज. ल. पावरा)
उपसचिव, गृह विभाग

प्रत,

१. अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे,
२. कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय),महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. कारागृह उपमहानिरीक्षक (पूर्व विभाग), नागपूर,
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य, नागपूर,
६. कोषागार अधिकारी, गडचिरोली,
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर,
८. सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमारती-२) मंत्रालय,मुंबई-३२,
९. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२,
१०. निवडनस्ती, (तुरुंग-२)